हिंदी साहित्यामध्ये अस्पृश्यांवरील अत्याचारांविषयीच्या जाणिवांची मोठी परंपरा आहे. जहूर बख्श या लेखक-शिक्षकाची "अछूत" (अस्पृश्य) हे शीर्षक असलेली कथा पहिल्यांदा "चांद" मासिकाच्या "अस्पृश्य" या विशेषांकात छापली गेली. ते साल होते १९२७. या कथेमध्ये, एका अस्पृश्य कुटुंबाच्या अत्यंत कठीण परिस्थितीचे हृदय पिळवटून टाकणारे वर्णन आहे. ही कहाणी जरी काल्पनिक असली तरी तिचा आधार अस्पृश्यांचे निर्मम शोषण करणाऱ्या हिंदू समाजात आहे. अस्पृश्यांच्या स्त्रिया आणि मुले देखील या अत्याचारातून सुटली नाहीत. परंतु, अशाच एका मुलाला मिशनऱ्यांचे साहाय्य मिळते. शिक्षण घेऊन तो आयुष्यात पुढे जातो आणि तहसीलदार बनतो. लोकांच्या एका मोठ्या समूहाने हिंदू धर्म का सोडला आणि ते मुसलमान किंवा ख्रिश्चन का बनले, याची पार्श्वभूमी ही कथा आपल्याला सांगते. कुणीही कुणापेक्षा श्रेष्ठ किंवा कनिष्ठ नाही आणि सर्वांना माणुसकीने आणि आदराने वागवले पाहिजे हा या कथेचा संदेश आहे.

# एका अस्पृश्याची आत्मकथा

जहूर बख्श

# एका अस्पृश्याची आत्मकथा

श्री. थॉमस ख्रिश्चन धर्मीय भारतीय होते. खूपच हसतमुख, आनंदी आणि हजरजबाबी व्यक्तिमत्व होते त्यांचे! बळकट शरीरयष्टी आणि गव्हाळी रंग. साहेबाचा पोशाख त्यांना मनापासून पसंत होता. त्या काळी ते रामपूरचे तहसीलदार होते. त्यांच्या स्वभावात एक तऱ्हेवाईक गोष्ट होती. त्यांना हिंदूविषयी खूप तिरस्कार वाटे. हिंदूंच्या खटल्यांमध्ये ते गरजेपेक्षा जास्त कडक रहात. त्यांच्या अधिकार क्षेत्रात काम करणारे हिंदू कर्मचारी सुद्धा त्यांच्या बाबतीत समाधानी नव्हते. मुसलमानांविषयी मात्र त्यांच्या भावना खूप वेगळ्या होत्या. मुसलमानांचे खटले चालवताना त्यांचे हे क्रौर्य कुठल्या कुठे पळून जात असे. मुसलमान कर्मचारी, मग तो अगदी सामान्य शिपाई जरी असला तरी तो त्यांच्या मायेला पात्र होता. ख्रिश्चन तर तसेही त्यांचे जातभाई होते, त्यामुळे त्यांच्यासाठी वाटणारे प्रेम स्वाभाविकच होते. थॉमस साहेबांच्या भिन्न धर्मियांप्रती असलेल्या या भिन्न दृष्टीकोनांमुळे मी मनातल्या मनात खूपच उद्विग्न होत असे.

मी थॉमस साहेबांचा न्यायालयातील रीडर होतो. जातीने ब्राह्मण होतो, त्यामुळे थॉमस साहेबांची नेहमीच माझ्यावर वक्रदृष्टी होती. मी कितीही मेहनत घेतली, मन लावून काम केले तरी साहेबांचे रागावणे काही चुकत नसे. माझ्यासोबत एक कारकून काम करत असे. तो अत्यंत निष्काळजी होता पण त्याला साहेबांच्या स्वभावाची चांगलीच ओळख झाली होती. तो नेहमीच अतिशय निकृष्ट आणि हलक्या दर्जाचे काम करत असे. पण साहेब त्याला मात्र कधी रागवत नसत. अगदीच झाले तर प्रेमाने झिडकारून जाऊ देत. इतक्या जवळून त्यांची अशी दुहेरी वर्तणूक पाहून माझे हृदय अतिशय दु:खी होत असे. मी मनातल्या मनात विचार करत असे, माझ्यावरच साहेबांची वक्रदृष्टी का? मी यांचे काय वाईट केले आहे? परंतु सरकारी नोकरीत असताना, अधिकाऱ्यासमोर, आणि त्यातून तो जर मॅजिस्ट्रेट असेल, तर तोंड उघडणे म्हणजे आपत्तीला आमंत्रण देणे! लाचार, मन मारून मी गप्प रहात असे.

एकदा काय झाले, माझी पत्नी आजारी पडली. तिच्या औषधपाण्याची व्यवस्था करण्यासाठी मला सुट्टी घेण्याची गरज होती. मी थॉमस साहेबांकडे फक्त पाच दिवसांची सुट्टी मागितली. पण सहानुभूती देण्याऐवजी त्यांनी मला अत्यंत वाईट पद्धतीने झिडकारले. एक तर पत्नी आजारी, मन तसेही खिन्न होते. यावर साहेबांचे फटकारणे! रागाने माझे शरीर थरथरू लागले, डोळे लाल झाले आणि हातांच्या मुठी वळल्या. पण, साहेबांच्या कठोर चेहऱ्याकडे बघून मी राग आतल्या आत गिळला. तरी मी निश्चय केला की आज साहेबांना त्यांच्या रागावण्याचे कारण विचारेनच.

कोर्ट बंद झाल्या झाल्या मी थॉमस साहेबांच्या बंगल्यावर पोचलो. त्या वेळी ते खुर्चीत बसून निवांत सिगार ओढत होते. मी त्यांना नमस्कार करून तिथेच गप्प उभा राहिलो. धूर सोडत साहेबांनी विचारले - काय म्हणतोस, पंडित?

मी नम्र स्वरात म्हणालो - हुजूर, क्षमस्व, एक विनंती आहे.

यावर थॉमस साहेब थोडे रुक्षपणे म्हणाले - समजले मला. सुट्टी सोडून दुसरी कोणती गोष्ट आहे का जी तुम्हा लोकांना हवी असते? पहावे तेव्हा सुट्टी हवी! मी कुठवर सुट्ट्या वाटत फिरू?

मी म्हणालो - नाही सर, विनंती वेगळी आहे. पण सांगताना भीती वाटते. तुम्हाला राग तर नाही ना येणार!

साहेब म्हणाले - भीती कसली? बोल!

मी म्हणालो - हुजूर, जेव्हा पाहतो तेव्हा तुम्हाला हिंदूंवर चिडलेलेच पाहतो. मी कसे काम करतो, तुम्हाला चांगलं माहित आहे. मी कधीही सुट्टी मागत नाही. माझा कनिष्ठ कारकून मुसलमान आहे, त्याचे ही काम कसे आहे तुम्हाला चांगले माहित आहे. माझी पत्नी आजारी आहे, बरीच आजारी आहे. मी तुमचा आज्ञाकारी नोकर आहे. तुमच्याकडून सहानुभूतीची, मदतीची आशा आहे. पण तुमच्याकडून फक्त अपमान आणि दु:ख मिळते. मला जाणून घ्यायचे आहे की तुमचा हिंदूंवर इतका राग का? त्यांनी असे कोणते पाप केले आहे?

बोलायला तर मी हे सगळं बोलून गेलो, पण भीतीने माझे प्राण कंठाशी आले होते. मी त्यांच्याकडे पाहू पण शकत नव्हतो. नजर खाली वळवून उभा राहिलो. परंतु, साहेब रागावले नाहीत. मला खूप आश्चर्य वाटले. धाडस करून मी वर पाहिले. ते विचारात हरवले होते. कपाळावर आठ्या होत्या. सिगारचा एक झुरका ओढून गंभीर होऊन म्हणाले - पंडित! ही गोष्ट विचारण्याची नाहीच. मला हिंदूंचा राग येतो. त्यांच्याकडे पाहिले तरी माझे रक्त खवळून उठते. ओह! तू विचारतोस की हिंदूंनी काय पाप केले आहे?

तुम्ही म्हणता, ख्रिश्चन पापी आहेत, दुसऱ्यांच्या संपत्तीवर त्यांचा डोळा असतो. मुसलमान पापी आहेत, खूप पापी आहेत. हिंदूंना दुखावतात. पण पंडित! यात वाईट वाटून घेण्यासारखे काही नाही. मी म्हणतो, ख्रिश्चन आणि मुसलमान तुमच्या एवढे पापी अजिबात नाहीत. शक्य आहे की त्यांनी इतरांना त्रास दिला असेल, पण ते आपल्या समाजावर तरी प्रेम करतात. आपल्या भावांच्या सुख-दु:खात सामील होतात. पण एक तुमचा समाज आहे, तुम्हाला आपसात सुद्धा प्रेम करता येत नाही. तुम्ही उलट आपल्याच लोकांवर अत्याचार करता. आपल्याच समाजातील दीन-दुबळ्या लोकांसोबत निर्दयी वर्तणूक करता, क्रूरपणे वागता. त्यांना रडताना पाहून आनंद होतो तुम्हाला. ओह! या पराकोटीच्या क्रौर्याला काही सीमा आहे? कुणी दुसरे आहे या जगात इतके क्रूर? तरी तू विचारतोस की हिंदूंनी काय पाप केले आहे? अरे दुष्टा! माहित आहे मी कोण आहे? मी तुमच्या याच देशात, तुमच्याच धर्मात जन्माला आलेला हिंदू आहे. मला ख्रिश्चन कुणी बनवले? तुम्ही, अरे तुम्हीच. तरी तू मला विचारतोस की हिंदूंनी माझे काय वाईट केले आहे? तुम्ही मला राम आणि कृष्णाच्या मांडीवरून उचलून येशूच्या मांडीवर फेकले, हे साधे पाप आहे? मी तुमचा तिरस्कार करू की जे माझ्या वाईट दिवसात माझे सहायक बनले, ज्यांनी मला लहानाचे मोठे केले, शिकून-सवरून माणूस बनवले, त्यांचा करू?

माझ्याच समोर हा साहेब माझ्याच धर्माला शिव्या देत आहे, हे पाहून मला प्रचंड संताप आला. खूप राग आला, पण नोकर माणसाचा स्वाभिमान पोटाकडे पाहून छूमंतर होतो. मी त्यांना विचारले - हुजूर, हे तुम्ही काय बोलताय, मला तर काही समजत नाही.

साहेबांनी स्मित केले आणि म्हणाले - तुला कसं बरं समजेल? जर तुझी समज, तुझी बुद्धि इतकी तीक्ष्ण असती तर मी ख्रिश्चन तरी का झालो असतो? बरं, बस. उभा किती वेळ राहशील?

पडत्या फळाची आज्ञा घेऊन मी गादीवर बसलो आणि विचार करू लागलो. आज यांना झालंय तरी काय? असल्या निरर्थक गप्पा तर ते कधी करत नाहीत. यांना ख्रिश्चन व्हायचं होतं, ते झाले; यात माझा किंवा हिंदू समाजाचा काय दोष?

थोडं थांबून साहेबांनी मला विचारलं - काय रे पंडित, या गादीवर जर कुणी भंगी किंवा बुरुड (एक अस्पृश्य जात) येऊन बसला, तर तू काय करशील?

मी सहजच म्हणालो - हुजूर, हा पण काय प्रश्न झाला! एक तर मी त्याला इथे बसूच देणार नाही, आणि तरीही जर तो बसला तर मी त्याला चांगलाच बदडून काढल्याशिवाय राहणार नाही. भंगी किंवा बुरुडासारख्या अस्पृश्य जातीला माझ्यासारख्या कुलीन ब्राम्हणाच्या बरोबरीने बसण्याचा कुठला आलाय अधिकार? समाजात माझी जी पत आहे, ती कुणा भंगी-बुरुडाला कशी मिळेल? हं? त्याला बदडून मी घरी जाईन आणि स्वत:ची शुद्धी करून घेईन.

साहेब - पण तू त्यांचा इतका तिरस्कार का करतोस? ती माणसं नाहीत का? की त्यांना तुझ्यासारखे हृदय नाही? तुझी निर्मिती करणाऱ्या त्या परमेश्वरानेच त्यांचीही निर्मिती नाही का केली?

मी - हुजूर, हे तर कुणीच नाकारू शकत नाही की त्यांना सुद्धा परमेश्वरानेच निर्माण केले. त्या ईश्वरानेच तर ही सारी सृष्टी निर्माण केली आहे. त्यांना पण हृदय आहे. पण देवानेच नाही का त्यांना खालच्या जातीत जन्माला घातले! त्यांचा जन्म आमची सेवा करण्यासाठी झाला आहे. आमच्या धर्मशास्त्रांनीच ही मर्यादा ठरवून दिली आहे. त्यांची सावली जरी आमच्यावर पडली तरी आम्ही अपवित्र होतो, आम्हाला पाप लागते. त्यासाठी आम्हाला प्रायश्चित्त घ्यावे लागते. त्यामुळे मर्यादेत राहून तन-मनाने आमची सेवा करत राहणे, यातच त्यांचे भले आहे. दुसरं म्हणजे शूद्रांचे आचार-विचार पण अपवित्र असतात, मग आम्ही त्यांच्या सोबत का संपर्क ठेवावा? का त्यांचा तिरस्कार करू नये?

साहेब - बरं, काही वेळासाठी तुझे म्हणणे मान्य करू. पण सगळ्याच शूद्रांचे आचार-विचार तर अपवित्र नसतात? अनेक शूद्रांचे आचार-विचार अतिशय पवित्र असलेले दिसतात. आणि सर्व वरच्या जातीतील हिंदूंचे आचार-विचार तरी कुठे पवित्र असतात? बरेच ब्राम्हण चोरी करतात, नेहमी खोटं बोलतात, दारू पितात आणि व्यभिचार करतात. त्यांच्यात ब्राम्हण्याचा अंश पण दिसत नाही. आता सांग, असा भ्रष्ट ब्राम्हण चांगला की एक पवित्र आचरण असणारा शूद्र?

मी - ब्राम्हण वंशात जन्म घेतला एवढ्या एका कारणामुळे भ्रष्ट ब्राम्हण सुद्धा पवित्र आचरण असणाऱ्या शुद्रापेक्षा श्रेष्ठ ठरतो, हुजूर. वाईट वाटून घेऊ नका, पण ब्राम्हण ब्राम्हणच आहे, आणि शूद्र शूद्रच राहील. शूद्र कसा ब्राम्हणाची बरोबरी करू शकेल? आणि जरी मी शूद्राला ब्राम्हणापेक्षा चांगला मानला तरी समाज काही त्याला श्रेष्ठ मानणार नाही!

साहेब - हीच तर तुम्हा लोकांची आंधळी परंपरा आहे. आपल्याच धर्मग्रंथांना तुम्ही आपल्याच हातांनी नष्ट करता. मनुस्मृतीमध्ये स्पष्ट लिहिले आहे की जो ब्राम्हण ब्राम्हण-धर्माचे पालन करत नाही, तो ब्राम्हण नाही. चांडाळापेक्षाही तो हीन आहे. तसच, चांडाळ सुद्धा पवित्र वर्तणुकीने श्रेष्ठ पदाला पोचू शकतो. अजामिल कोण होता? शबरी कोण होती? त्यांनी श्रेष्ठत्व कसे प्राप्त केले? पण आता सगळीकडेच उलटी गंगा वाहते आहे. तुम्ही लोकांनी फक्त स्वतःच्या स्वार्थासाठी, फक्त आपले श्रेष्ठत्व कायम ठेवण्यासाठी शूद्रांना पशूंपेक्षा सुद्धा निकृष्ट स्थान दिले. जणू काही ते मनुष्यच नाहीत! तरी देखील जेव्हा पहावं तेव्हा तुम्ही धर्मग्रंथांचे दाखले देत असता. बरं, मला सांग, जर कुणी शूद्र तुमच्या देवळात देवदर्शनासाठी जाऊ इच्छित असेल, तर तुम्ही त्याला जाऊ द्याल की नाही?

मी - हुजूर, लोकरुढींमध्ये सुद्धा काही ना काही आशय असतोच ना! शूद्र अगदी सुरुवातीपासून अस्पृश्य मानले गेले आहेत. त्यामुळे आम्ही त्यांचा तिरस्कार करतो. आता ही भावना कशी जाईल बरं? राहिला त्यांच्या मंदिर प्रवेशाचा प्रश्न, तर ती अगदीच अशक्य गोष्ट आहे. जर ते देवळात गेले तर त्यांच्या स्पर्शाने आम्ही अपवित्र होऊ, देऊळ पण अपवित्र होईल आणि देवाचा घोर अपमान होईल. अस्पृश्यांनी आपले स्वतःचे देऊळ बनवून त्यात आनंदाने देवाचे दर्शन घ्यावे.

साहेब - व्वा! काय म्हणायचं या तर्काला! देवाच्या दरबारी पण हा भेदभाव! अस्पृश्यांची निर्मिती करून देव अपवित्र नाही झाला, त्यामुळे त्याचा अपमान नाही झाला; पण तुमच्या देवळात अस्पृश्याची पाऊले पडताच देऊळ अपवित्र होईल, देवाचा अपमान होईल! आणि काय रे, अस्पृश्यांनी आपली देवळे स्थापिली, त्यात देव बसवले, तर मग देवांच्या अपमानाची सीमाच उरणार नाही! देवांचा असा घोर अपमान, तोही रोज तुम्ही पाहू शकाल? यामुळे जर देव कोपले आणि त्यामुळे प्रलय होऊन हे विश्व बुडून गेले, तर तुम्ही कुठे जाल?

साहेबांच्या या वक्तव्यावर मला उत्तर सुचेना, मी चकित झालो होतो. साहेब पुन्हा म्हणाले - तुमच्या या विचारांमुळेच तुम्ही अस्पृश्यांवर अत्याचार करता, त्यांची सावली पडली तरी अपवित्र होता, ते दिवस-रात्र तुमची सेवा करतात, तरी तुम्ही त्यांचा तिरस्कार करता आणि त्यांना अपशब्द ऐकवत राहता. कुत्रा एक वेळ तुमच्या बिछान्यावर येऊन बसेल, पण एक अस्पृश्य तुमच्या घराची पायरी चढू शकत नाही, ते तुमच्या विहिरीतून पाणी घेऊ शकत नाहीत, तुमच्या देवळांकडे मान वर करून पाहू शकत नाहीत. असे किती अत्याचार त्यांच्या सेवांचे बक्षीस म्हणून तुम्ही त्यांना देता! तुला अंदाज आहे, तुमच्या या क्रूर वागण्यामुळे त्यांना किती दु:ख होत असेल? आणि यामुळे तुमची किती हानी होते, याची कल्पना आहे तुम्हाला?

साहेब - बरं ऐक, एक जुनी घटना आठवली, ती सांगतो. एका छोट्या गावात एक बुरुड (अस्पृश्य) रहात असे. गावाबाहेर एका कोपऱ्यात त्याचे अगदी मोडकळीला आलेले घर होते. कारण त्याच्यासारख्या खालच्या जातीचा माणूस, गावात जिथे थोडा वेळ थांबू सुद्धा शकत नाही, तिथे त्याचे घर गावात असणे तर अशक्य गोष्ट होती. बुरुडाच्या घराला लागून जंगल होते. तू कल्पना करू शकतोस की जंगल जवळ असल्यामुळे तो किती भीतीदायक अवस्थेत जगत असेल. संध्याकाळ झाल्याबरोबर त्याच्या घराची दारे बंद होत असत. अगदी जवळून जंगली जनावरांचे हुंकार आणि चीत्कार ऐकू येत. भीतीने कापत, जागत त्याचे कुटुंब रात्रीच्या रात्री घालवत असे. या भारतातील किती अस्पृश्य जाती शहर आणि गावांबाहेर या प्रकारे भीतीयुक्त वातावरणात जीवन जगत असतील, कोण सांगू शकेल? असो.

बुरुडाचे कुटुंब लहानसे होते. तीनच माणसे, पती-पत्नी आणि त्यांचा आठ-दहा वर्षांचा छोटा मुलगा. तरी त्यांचे कसेबसे भागत असे. ना कधी दोन वेळचे पोटभर जेवण मिळे, ना कधी अंगभर कपडे. या पती-पत्नीवर संपूर्ण गावाची सेवा करण्याचा भार होता. बुरुड गावातल्या सर्व सणा-समारंभांच्या वेळी बाजा वाजवायला जात असे, आणि त्याची बायको दाईचे काम करत असे. या बदल्यात त्यांना प्रत्येक शेतकऱ्याकडून काही ठराविक धान्य मिळत असे. ते पण पुन्हा पुन्हा मागून आणि चकरा मार-मारून. एवढे करून पण ठरलेले पूर्ण धान्य मिळत नसे. देणारे काही ना काही चुका काढून धान्य कमी देत असत. शुभकामांच्या वेळी त्यांना कधी जुने-फाटके कपडे मिळत, कधी कुणी दयावान चार-सहा पैसे दान करत असे. वेळ मिळाला की बुरुड बांबूचे सूप, टोकरी, पंखे, चटई इत्यादी वस्तू बनवत असे.

यातून कधी कधी त्याला थोडी वरची कमाई होत असे. याप्रकारे हे अस्पृश्य कुटुंब मोठ्या कष्टाने, आणि तरीही शांत चित्ताने आणि समाधानाने आपली गुजराण करत असे. आपल्या दात्यांना आशीर्वाद देत, त्यांच्या भल्यासाठी प्रार्थना करत.

एकदा काय झाले ते ऐक. उन्हाळ्याचे दिवस होते. गावातल्या मालगुजाराच्या मुलाचे लग्न होते. बुरुडाला तिकडे बाजा वाजवायला जावे लागले. एकीकडे काही मिळेल ही आशा आणि दुसरीकडे मालगुजाराचे भय. तिथे बरी कमाई होईल या आशेने बिचारा त्यांच्या दारात बसून उन्हातान्हाचा बाजा वाजवत राहिला. पण या आशेनेच त्याचा घात केला. त्याला ऊन लागले. संध्याकाळ होता होता त्याला चांगलाच ताप चढला आणि घरी आल्या आल्या तो चटई वर कोसळला. सकाळ झाली, मालगुजाराकडे बुरुड पोचला नाही. मग काय, एक शिपाई तत्काळ यमदूत बनून त्याच्या घरी आला आणि गरजला - काय रे दुष्टा! इतका माज! अजुन बाजा घेऊन आला नाहीस? किती वेळ तुझी वाट पहायची! तेव्हा सुद्धा बुरुडाला खूप ताप होता, डोके प्रचंड दुखत होते. त्याने अत्यंत दीन स्वरात शिपायाला सांगितले - सरकार! मी तापाने फणफणलो आहे. नाही तर न बोलावताच हजर झालो असतो. माझ्यात एक पाऊल चालायची शक्ती नाही! गरीब खरे जरी बोलला तरी विश्वास कोण करेल? बुरुडाचे बोलणे ऐकून शिपायाला राग अनावर झाला. चिडून म्हणाला - अरे नालायका, मला सगळं माहीत आहे. तू एक नंबरचा बदमाश आहेस. दारू पिऊन आला असशील, आणि काय! आणि आता कारणं सांगतोस. आता बऱ्या बोलाने येतोस की नाही! बुरुडाने अनेक विनंत्या केल्या, त्याच्या पत्नीने करूण प्रार्थना केल्या, रडली-भेकली. पण शिपाई होता मालगुजाराचा माणूस.

गरिबांच्या प्रार्थनांनी मालगुजारांच्या शिपायांचे हृदय पाघळू लागले तर त्यांचे राज्य कसे टिकेल? तात्पर्य, सर्व प्रार्थना निष्फळ ठरल्या आणि बुरुड भरलेल्या डोळ्यांनी शिपायाबरोबर गेला. त्याने मालगुजाराला सुद्धा पुन्हा पुन्हा आपले दु:ख सांगितले, पण त्याने आपल्या सेवकांना आज्ञा केली - या बदमाशाला या गावात कुणी राहू दिले? याला काढा इथून आणि इतका मार द्या की कायम आठवण राहील. बुरुड काय करेल बिचारा? संध्याकाळ पर्यंत बाजा वाजवत बसला. संध्याकाळ होता होता अडखळत घरी आला! दारातच चक्कर येऊन कोसळला आणि बेशुद्ध झाला. यानंतर त्याला शुद्ध आलीच नाही. अर्धी रात्र होता होता त्याची जीवन-ज्योत मावळली. त्याचा पवित्र आत्मा अस्पृश्य शरीर सोडून कोणत्या तरी पावन ठिकाणी निघून गेला. बिचाऱ्याची बायको निराधार झाली, मुलगा अनाथ झाला. त्या मातेने मुलासह जंगलातील ती काळरात्र कशी व्यतित केली असेल, याची कल्पना ही करवत नाही!

सकाळ झाली. चिमण्या चिवचिवू लागल्या, थंड वारे वाहू लागले, नवे जीवन सुरु झाले. अशा आनंदी सकाळी, बुरुडाच्या बायकोने मात्र दु:खी अंत:करणाने घराचे दार उघडले. या वेळी तिच्या पुढे फक्त पतीच्या शवाची विल्हेवाट कशी लावायची हाच प्रश्न होता. जवळ एक पैसा नव्हता, सगळा गाव अस्पृश्य, अपवित्र समजत होता, पतीचे अंत्यसंस्कार कसे होणार? आह! अस्पृश्याचे जीवन किती अवघड आहे! मेल्यावर सुद्धा त्याला कुठे जागा नाही! मरण जीवनापेक्षाही कठीण बनले आहे! त्याच गावात दुसऱ्या कोपऱ्यात अजुन एक बुरुड रहात होता. विधवा पत्नी पतीच्या शवाजवळ आपल्या लहानग्याला बसवून त्याच्याकडे गेली. तो म्हणाला - ताई, मी सुद्धा तुझ्यासारखाच अभागी आहे. मी एकटा काय करू? तू मालगुजाराकडे जा. त्याला जर दया आली तर तोच काही तरी बंदोबस्त करेल.

बुरुडीण त्या बुरुडासोबत मालगुजाराकडे गेली. तेव्हा मालगुजार बैठकीत बसून मजेत हुक्का पीत होता. त्याला पाहताच बुरुडीण रडू लागली. म्हणाली - सरकार, मी सर्वस्व गमावले! नशिबाने माझा पती माझ्यापासून हिरावून घेतला!

मालगुजार होता कठोर पशु, त्याच्या जवळ कणभर सुद्धा दयामाया नव्हती. चिडून म्हणाला - तुझे सर्वस्व हरवले तर मी काय करू? मी तुझा पती तुला परत करू शकत नाही. आपले काळे तोंड घेऊन अपशकून करायला सकाळी सकाळी इथे येऊन पोचलीस! बुरुडाने हात जोडून विनंती केली - सरकार, तुम्ही खरे बोलत आहात. कुणीच कुणाचे नशीब बदलू शकत नाही. तिच्या नशिबात होते ते झाले. तुम्ही थोडी दया करा सरकार! तिच्या पतीच्या अंत्यसंस्कारासाठी थोडी सोय करा.

यावर तर मालगुजार अजूनच भडकला - अस्सं का? मी काय तुमचा देणेकरी लागतो की मी काही करू? जा जा, आल्या वाटेने निघून जा. बिचारा बुरुड कातर आवाजात त्या दुष्टाला म्हणाला - नाही सरकार, असे म्हणू नका. तुम्ही आमचे दु:ख समजून नाही घेतले तर कोण घेईल? तुम्ही माय-बाप आहात आमचे! तुम्ही मदत नाही केली तर कोण करेल? पण, त्या पाषाण हृदयी माणसावर कशाचाही परिणाम झाला नाही. तो गरजला - एकदा सांगितले ना मी काही करू शकत नाही. निघता की नाही इथून? पण, बुरुडीण ऐकायला तयार नव्हती. विलाप करत तिने लोटांगण घातले आणि मालगुजाराला म्हणाली - तुम्ही माझ्या पित्यासमान आहात हुजूर, माझ्यावर दया करा. आता तर मालगुजार खूपच संतापला आणि म्हणू लागला - अरे देवा! सकाळी सकाळी एवढा अपशकून! आणि इतका आरडा-ओरडा! या बदमाशांनी तर माझे जीवन नरक करून टाकले आहे. आता मला सहन होत नाही. मी काय या गावात एकटा राहतो, की तुम्ही सरळ माझ्याकडे निघून आलात? कोण आहे रे तिकडे? साल्यांना मार-मारून आत्ता इथून चालते करा!

हे ऐकून दोघे बिचारे तिथून निघाले. गावातल्या दोन-चार सज्जन समजल्या जाणाऱ्यांकडे जाऊन विनंत्या केल्या. कुणी डोळे वटारले, कुणी अपमानित केले तर कुणी शिव्या दिल्या! पण स्वत:ला श्रेष्ठ समजणाऱ्या भल्या इसमांपैकी कुणी एक सुद्‌धा असा निघाला नाही की जो मदत करेल, सहानुभूतीचे दोन शब्द बोलेल. हा आहे तुमचा पवित्र हिंदू समाज आणि त्यांचे उच्च वर्तन, जो आपल्याच लोकांसोबत इतके वाईट वागतो. त्या बुरुडाने आयुष्यभर या गावाची, हिंदू समाजाची सेवा केली होती, सेवा करता-करता त्याने मृत्यू पत्करला होता! हिंदू समाजाचे कर्तव्य होते की नाही की आपल्या या सच्च्या सेवकाच्या मृत्यूनंतर थोडे दु:ख करतील, आदराने त्याचे अंतिम संस्कार करतील आणि त्याच्या विधवेबरोबर सांत्वनाचे दोन शब्द बोलतील? पण नाही. हिंदू समाज या कर्तव्यच्युतीलाच कर्तव्यपालन समजतो आणि त्यातच तो समाधानी आहे. भारत हा एकच देश असा आहे जिथे माणसाला पशुपेक्षा खालचे स्थान आहे. जिथे माणसाचा केवळ तिरस्कारच नाही केला जात तर त्याला आयुष्यभर आणि मेल्यावर सुद्‌धा रडवले जाते. मला सांग, कुणा परक्यासाठी आपला अपमान करून घेणारा तो अस्पृश्य, नीच बुरुड श्रेष्ठ की स्वत:ला श्रेष्ठ समजणारे ते ब्राम्हण, क्षत्रिय आणि वैश्य श्रेष्ठ? असो.

आता तर बिचाऱ्या बुरुडिणीला चहूकडे अंधार दिसू लागला. नवऱ्याचे शरीर स्मशानापर्यंत कसे पोहोचवायचे? जाळायचे कसे? विचार कर-करून व्याकूळ झाली बिचारी. ती बुरुडाला म्हणाली - भाऊ, आता मी काय करू? यांचे शव असेच पडून राहणार का कोणत्याही क्रियाकर्मा शिवाय? बुरुड म्हणाला - ताई, घाबरून कसे चालेल? गरीबांची लाज ईश्वराच्या हाती! त्याला आपली काळजी! त्याने आपल्या घरी जितके इंधन होते ते सर्व आणले. तिने पण घरातले सगळे इंधन काढले. पण ते एवढे नव्हते की त्याने प्रेत जाळता येईल. मग तिने घराचे निम्मे छप्पर खाली घेतले. सगळा लाकूड-फाटा दोघांनी ओढून स्मशानापर्यंत नेला. त्यांनंतर कसेबसे प्रेत नेले आणि त्याचा अंत्यसंस्कार केला. पंडित, विचार कर, त्या विधवेची अवस्था काय झाली असेल हे सगळं करताना? एक तर नवरा गेलेला, दुसरं, गावातील लोकांनी मदत तर नाहीच केली उलट अपमान केला. तिसरं, प्रेताच्या अंतिम संस्कारासाठी इतकी मेहनत, इतके नियोजन करावे लागले, इतके की तिचे घर पण मोडकळीला आले. चौथे, तिचे मूल तहान-भुकेने बेजार तिच्या मागे मागे फिरत असेल. ओह! हे दृश्य किती भयानक असेल! एका माणसावर दु:ख कोसळते आणि त्यावेळी इतर आपल्या श्रेष्ठतेच्या खोट्या अभिमानामध्ये धुंद होऊन हे करूण दृश्य केवळ बघत राहतात. किती अप्रिय, किती हृदयहीन आहे हे. हीच का तुमच्या हिंदू समाजाची श्रेष्ठता?

एवढे बोलून साहेब गप्प झाले. त्यांचे डोळे भरून आले. गालांवर अश्रू ओघळले. इतका कोमल भाव, इतका विशाद त्यांच्या चेहऱ्यावर मी कधीच पाहिला नव्हता. मी एकटक त्यांच्याकडे पहात राहिलो. काही क्षण शांततेत गेल्यावर साहेब पुन्हा म्हणाले - पंडित, आपल्या समाजाच्या यशोगाथा अजुन ऐकायच्या आहेत तुला? ऐक तर, ही करुण गाथा इथेच संपली नाही. अजुन करुण दृश्य पाहशील तू. हां! त्या दिवशीच्या गावकऱ्यांच्या क्रूर वागण्याचा त्या भल्या बुरुडाच्या मनावर खूपच आघात झाला. तो बुरूडीणीला म्हणाला - ताई, आता या गावात राहण्यात अर्थ नाही उरला. गावकऱ्यांचे वर्तन तू पाहिलेच. आपल्या जातीचे पण इथे कुणी नाही. उद्या मेलो तर माझ्या प्रेताला कावळे-कुत्री खातील. मी तर आता इथे राहू शकत नाही. आजच मी दुसऱ्या ठिकाणी निघून जाईन. तू पण इथे राहू नकोस. या गावापेक्षा तर जंगलात उपाशी तापाशी मेलेले बरे. तिथे आपल्याला पाहून कुणी शिव्या देणार नाहीत की कपाळावर आठ्या आणणार नाहीत. आपल्या शुभ चिंतकाचे हे बोलणे ऐकून बुरुडीण हमसून हमसून रडू लागली. म्हणाली - भाऊ, जा तू. अश्या लोकांमध्ये आपण न राहिलेलं बरं. मी या लहानग्याला घेऊन कुठे जाणार? माझी लाज आता परमेश्वराच्या हातात! बुरुडाचे ही डोळे भरून आले. दु:खी होऊन म्हणाला - ताई, मीच माझ्या सोबत तुला घेऊन गेलो असतो. पण अजुन तर माझाच काही भरोसा नाही. जर माझे बस्तान कुठे बसले तर तुम्हा दोघांना बोलावून घेईन. या प्रकारे बुरुड त्यांना समजावून निघून गेला. मग त्याला गावात कुणी पाहिले नाही. बऱ्याच दिवसांनी समजले की तो सातासमुद्रा पलीकडे असलेल्या फिजी देशात निघून गेला.

आता बुरुडीण आणि तिच्या मुलाचे काय झाले ते ऐक. पतीच्या मृत्यू नंतर ती आधीच दु:खी होती, आता हा मुलगाच काय तो तिचा एकमेव आधार होता. तिच्या काळजाचा तुकडा होता. तिच्या सर्व आशा त्याच्यावर एकवटल्या होत्या. पतीच्या मृत्यूनंतर तिची कमाई खूपच कमी झाली होती. तरी तिला वाटे तिच्या मुलाला काही कमी पडू नये. तिच्या मुलाचे नाव होते दमरू. आईच्या कोड कौतुकाने तो चांगलाच स्वच्छंद झाला होता. भाकरी खाल्ल्या खाल्ल्या खेळायला बाहेर पळत असे. आई पण काही बोलत नसे.

मालगुजाराच्या घरामागे अंगणात बोराची अनेक झाडे होती. तिथली गोड गोड बोरं खायच्या मोहापोटी दमरू तिथे जाई. मालगुजाराचा एक सात-आठ वर्षांचा मुलगा होता. तो पण बोरं खायला यायचा. मुले निष्कपट असतात, स्पृश्य-अस्पृश्यतेचा भेदभाव त्यांच्या गावीही नसतो. दमरू झाडावर चढे, आणि जोरजोरात फांद्या हलवे, भरभरून बोरं खाली पडत. मालगुजाराचा मुलगा बोरं वेचत असे आणि मग दोघे मिळून ती खात. हळू-हळू त्यांच्यात घनिष्ट मैत्री झाली. दोघे एकमेकांना शोधत आणि भेटले की खुश होत. एके दिवशी मालगुजाराने दोघा मित्रांना पाहिले. त्याला खूप राग आला. त्याने आपल्या मुलाला दोन थपडा मारल्या आणि म्हणाला - खबरदार, पुन्हा या नीच मुलासोबत खेळताना दिसलास तर. दमरू अस्पृश्य होता म्हणून मार खाण्यापासून वाचला, पण मालगुजाराने त्याला बजावले - खबरदार, पुन्हा इथे दिसलास तर चामडी सोलून ठेवीन. मालगुजाराने ताकीद तर दिली पण कितीही ओरडा, रागवा, मुलांना कसा बरं रसभरीत गोड बोरांचा मोह आवरेल? दोघे मित्र भेटतच राहिले.

गावात एक छोटेसे देऊळ होते. तिथे मधून मधून भजन-कीर्तन होत असे. एके दिवशी मालगुजाराचा मुलगा दमरूला म्हणाला - आज देवळात मोठी पूजा आहे आणि प्रसादात पेढे वाटले जातील. तू पण ये माझ्याबरोबर. पेढ्याचे नाव ऐकून दमरू खुश झाला. त्याला काय माहित होते की त्याच्या देवळात जाण्याने देऊळ अपवित्र होईल? त्याला हे सुद्धा माहित नव्हते की त्याच्या सारख्या अपवित्र जीवाच्या नशिबात देवाचा प्रसाद मिळणे नाही. टाळ्या वाजवत, नाचत तो देवळात येऊन पोचला! त्याला पाहताच देवळात गोंधळ उडाला. नीच, अस्पृश्य, म्हणत लोक स्वत:चे पावित्र्य सांभाळण्यासाठी धावपळ, धडपड करू लागले. लोकांमध्ये उडालेला हा गोंधळ पाहून दमरू अवाक झाला. तो चांगलाच संकटात सापडला होता. लोकांमधली गडबड पाहून पुजारी घाबरला आणि जेव्हा त्याला दमरू दिसला, तेव्हा रागाने त्याचा स्वत:वरचा ताबा सुटला.

अरे देवा! कलियुगात या अस्पृश्यांची हिम्मत बघा किती वाढली आहे, असे म्हणत एखाद्या पशुलाही कुणी मारणार नाही इतक्या निर्दयीपणे त्याने दमरुला बदडून काढले. देवाच्या दारी प्रसाद मिळेल अशा आशेने गेलेला दमरू मार खाऊन आला. हिंदू लोक अहिंसेच्या मोठ्या गप्पा मारतात. छोट्या-छोट्या किड्यांवर नक्कीच दया दाखवतात पण त्यांच्या विशाल आणि दयाळू हृदयात प्रत्यक्ष मनुष्याचे शरीर धारण केलेल्या अस्पृश्यांसाठी दयेचा कणही सापडत नाही. आणि याचे कारण फक्त एवढेच की ते अस्पृश्य आहेत, अपवित्र आहेत, त्यांच्या स्पर्शाने सुद्धा हिंदूंची धर्म नौका अधर्माच्या वादळात बुडून जाते. असो.

प्रसादाच्या बदल्यात मार खाल्लेला दमरू रडत-कण्हत घरी पोचला. मातेने आपल्या लाडक्या मुलाची ही अवस्था पाहिली आणि ती अस्वस्थ झाली. तिने बाळाला मांडीवर घेऊन प्रेमाने विचारले - बाळा, काय झाले? रडत रडत दमरुने सगळा किस्सा सांगितला. ऐकून आईच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. तिने दमरूच्या चेहऱ्याचे चुंबन घेऊन त्याला धीर दिला. ती म्हणाली - बाळा, तू तिथे का गेलास? तू तिथे जायचं नाही. दमरूने विचारले - आई! का नाही जायचे मी तिथे? तिथे तर सगळे जातात. देवाचे दर्शन घेतात. तू का रडते आहेस? आई म्हणाली - बाळा, ते जाऊ शकतात पण आपण नाही जाऊ शकत. कारण आपण अस्पृश्य आहोत. दमरुला आईचे बोलणे नीट कळले नाही. त्याने मोठ्या आग्रहाने विचारले - आई, अस्पृश्य कुणाला म्हणतात? आपल्यात-त्यांच्यात काय फरक आहे? मला तर कोणताच फरक दिसत नाही. फरक म्हणशील तर इतकाच की आपण खराब फाटके कपडे घालतो. आई या प्रश्नाचे काय उत्तर देणार? ती रडू लागली. तेव्हा दमरू म्हणाला - बरं आई, तू रडू नकोस. मी आता कधीच देवळात जाणार नाही.

दमरू देवळात गेला या त्याच्या चुकीबद्दल पुजाऱ्याने त्याला कठोर शिक्षा केलीच होती. पण एवढ्याने गावकऱ्यांचे काही समाधान झाले नाही. त्यांनी पराचा कावळा केला. मालगुजारकडे तक्रार केली. मालगुजारने बुरुडिणीला बोलावले. रागाने लोक वेडेपिसे झाले होते. एवढेच बरे होते की ती अस्पृश्य होती, नाहीतर त्यांनी काय केले असते सांगता येत नाही. त्यांनी तिला भरपूर शिव्याशाप दिले. बुरुडिणीने हात जोडून विनंत्या केल्या, म्हणाली - महाराज, मुलगा लहान आहे. त्याला कुठे कळतंय त्याने देवळात जायचे की नाही!

त्याचा गुन्हा पोटात घाला, त्याला क्षमा करा. यापुढे असे होणार नाही. तिथून ती घरी आली आणि दमरूला म्हणाली - हे बघ बाळ, यापुढे तिथे कधीही जाऊ नकोस. घरातच खेळत जा. जर कुठे गेलास आणि कुणी काही बोलले तर मी तुला मोठ्ठा मार देईन. बिचारा दमरू घाबरला. त्या दिवसापासून तो कुठेही जात-येत नसे. आई पण विशेष लक्ष ठेवी. पण मुले बंधनात राहून तळमळत राहतात. काही दिवसांनी दमरूचे मन इकडे तिकडे फिरण्यासाठी व्याकूळ झाले. आणि एके दिवशी संधी पाहून तो घरातून पळाला. खेळता-खेळता त्याला तहान लागली. त्या वेळी विहिरीजवळ दोन-तीन स्त्रिया पाणी भरत होत्या. पाण्याच्या आशेने दमरू तिथे गेला. त्याने एका स्त्रीकडे पाणी मागितले. पण ती त्याला पाण्याऐवजी शिव्या देऊ लागली. त्या स्त्रियांनी आपल्या घागरी तिथेच फेकल्या. हे पाहून दमरुला चांगलाच धक्का बसला. आधीसारखे कुठले संकट उभे राहू नये, विचार करूनच तो घाबरून गेला. आणि पळत घरी येऊन लपला.

या वेळी गावात पहिल्या पेक्षा जास्त गोंधळ माजला. मालगुजाराच्या घरी बुरुडिणीला बोलावले गेले. तो ओरडून तिला म्हणाला - ए बाई, तू चांगलीच बदमाश झाली आहेस. मुलाला अगदी डोक्यावर चढवून ठेवले आहेस. आज त्याने विहीर अपवित्र केली. आता लोक पाणी कुठून पिणार? बुरुडिणीचे तर प्राण कंठाशी आले. हात जोडून म्हणाली - माई-बाप सरकार, मी तर त्याला सारखी डोळ्यासमोर ठेवते. सारखी रागावते. पण आज नजर चुकवून पळाला. मालगुजार चिडून म्हणाला - मी तुला चांगलं ओळखतो. तू अशी नाही ऐकणार. असे म्हणून त्याने आपल्या शिपायाला आज्ञा केली - ही अशी नाही ऐकणार, जरा हिचा समाचार घे बघू. काही हरकत नाही, नंतर आंघोळ करून टाक. हे ऐकून शिपाई त्या अबलेवर तुटून पडला.

बिचारी किती रडली-ओरडली, पण तिच्या करुण आक्रंदनाने कुणाचे ही हृदय द्रवले नाही. बोल पंडित! तुझ्या आदर्श समाजाच्या अहिंसेच्या व्रताचे आहे की नाही हे एक सुंदर उदाहरण? हिंदू पुरुषांचे शौर्य आपल्याच लोकांचा छळ करण्यापुरते, अबला स्त्रियांना रडवण्यापुरतेच उरले आहे, नाही? बुरुडीण रडत रडत घरी आली. आल्यावर मात्र तिने चंडिकेचे रूप धारण करून मुलाला विचारले - तू विहिरीवर का गेलास? घाबरून बालक थरथर कापू लागला. डोळ्यात पाणी आणून म्हणाला - आई, मला खूप तहान लागली होती. सगळेच जातात, म्हणून मी पण गेलो. तिकडे दोन-तीन मुलं अजुन होती. त्यांना तर कुणी काही बोलले नाही. पण, आईने मुलाच्या या निष्पाप बोलण्याकडे लक्ष दिले नाही. अपमान आणि संतापाने तिचे हृदय जळत होते.

ती स्वत:ला थांबवू शकली नाही आणि तिने मुलाला बेदम मारायला सुरुवात केली. मुलगा, नको आई, नको ग, म्हणत तिच्या पायांना पकडून विनंत्या करत राहिला, पण ती थांबली नाही. शेवटी मुलगा जमिनीवर पडला. रडत-रडत त्याचा श्वास गुदमरू लागला. मुलाची ही अवस्था पाहून आईचे हृदय पिळवटून निघाले. तिने त्याला मांडीवर उचलून घेतले आणि छातीशी धरले. दोघे आई-मुलगा कुणास ठाऊक किती वेळ रडत राहिले. त्या दिवशी त्यांच्याकडे चूल नाही पेटली. दोघे उपाशी पडून राहिले. तुमच्या हिंदू समाजाच्या या निर्मम अत्याचारांमुळे कुणास ठाऊक किती दीन-दु:खी, गरीब असेच रडत राहिले, उपाशी-तापाशी क्लेश सहन करत राहिले - कोण याचा हिशेब करणार? अरे! या इतक्या दु:खितांचे थंड उसासे तुम्हाला कुठवर सुखाने झोपू देतील? ती वेळ आता दूर नाही, जेव्हा तुम्हाला आपल्या या अत्याचारांसाठी रक्ताचे अश्रू गाळून प्रायश्चित्त करावे लागेल.

त्या दिवसापासून बुरुडीण जास्तच चिंता करू लागली. नेहमी हाच विचार करत असे - मी इतक्या धर्मांध कट्टर लोकांमध्ये राहते, ज्यांचा धर्म माझ्या निव्वळ सावलीने भ्रष्ट होतो. माझ्या जातीचे इथे कुणी नाही. कुणी सहानुभूती दाखवायला नाही. अशा लोकांमध्ये राहून माझे उर्वरित आयुष्य कसे पार पडणार? हे निष्पाप मूल नकळत काहीतरी अपराध करून बसले तर हे लोक जीवे मारून टाकायला कमी करणार नाहीत. दोन वेळा तर तो गुन्हा करून बसला आहेच, पुन्हा काही केले तर काय करतील कोण जाणे! परमेश्वरा! तूच माझ्या बाळाची काळजी घे बाबा!

शेवटी, देवाने तिची कातर विनंती ऐकली. काही दिवसांनी गावात दोन ख्रिस्ती मिशनरी स्त्रिया आल्या. त्यांनी गावातील स्त्रियांना महान येशूचा संदेश ऐकवला. बुरुडिणीने पण तो ऐकला. त्यांचे दयाळू वागणे, बोलणे ऐकून तिला आशा वाटली. तिने त्यांना आपली रामकहाणी ऐकवली. त्या दयाळू साध्वींच्या डोळ्यात तिची कहाणी ऐकून अश्रू दाटून आले. त्या बुरुडिणीला म्हणाल्या - येशू दु:खितांचे दु:ख दूर करण्यासाठीच पृथ्वीवर अवतरले होते. तू आमच्या सोबत चल. येशू तुमच्यावर पण दया करेल.

अत्यंत आनंदित होऊन बुरुडीण आपल्या मुलाला घेऊन त्यांच्या बरोबर निघून गेली. आता तिची जीवनधारा वेगळ्याच दिशेने वाहू लागली. तिने एका नव्या जगात प्रवेश केला होता, जिथे कुणी लहान-मोठे नव्हते, उच्च-नीच नव्हते, सगळे समान होते. सर्वांना सर्वांच्या सुख-दु:खाची काळजी होती. इथे तिला उगीच वाईट बोलणारे कुणी नव्हते, सगळे तिच्याशी आपलेपणाने बोलत. आता ती चांगले कपडे घालत असे, चांगले भोजन जेवत असे. इथे सगळेच तिच्या मुलावर माया करत, कुणी त्याचा तिरस्कार करत नव्हते. तो सुद्धा चांगले कपडे घाली, चांगले अन्न जेवे. खेळायला त्याला सुंदर खेळणी मिळत. मोकळ्या मैदानात, स्वच्छ हवेत स्वतंत्र पक्ष्यासारखे तो बागडत असे. कोणालाही स्पर्श करत असे, कुणालाही मिठी मारत असे. बंगला असो, देऊळ असो, मनाला वाटेल तिथे तो जाऊ शकत होता. यामुळे कुणी अपवित्र होत नव्हते, की कुठली इमारत भ्रष्ट होत नव्हती. खरंच, त्या दु:खी आई-मुलावर येशूने दया केली होती. बरं तर पंडित, सांग बरं, या दोघांच्या ख्रिश्चन बनण्याने तुमचे कसे नुकसान झाले?

मी म्हणालो - हुजूर, त्यांना ख्रिश्चन व्हायला तर कुणी सांगितले नव्हते! ते आपल्या इच्छेने ख्रिश्चन बनले, त्याला कोण काय करणार? यामुळे माझे किंवा हिंदू समाजाचे काय नुकसान आहे?

यावर साहेब तत्परतेने म्हणाले - हे तर खरंच आहे की त्यांना कुणीच ख्रिश्चन धर्म स्वीकारायला सांगितले नव्हते. पण, तुमच्या हिंदू समाजाने त्यांच्याबरोबर इतके क्रूर वर्तन केले होते की त्यांच्या समोर मुसलमान किंवा ख्रिश्चन होण्या व्यतिरिक्त आपला जीव वाचवण्याचा दुसरा पर्यायच नव्हता. अस्पृश्यांबरोबर तुमचे वागणे असेच राहिले तर तो दिवस दूर नाही जेव्हा सगळे अस्पृश्य हिंदू धर्माचा त्याग करून इतर धर्मांचा आश्रय घेतील. यामुळे हिंदू समाजाचे मोठ्या प्रमाणात विघटन नाही का होणार? मग काय तुमच्याच बायका दायांची कामे करतील? आणि धोब्याचे काम काय तुम्हीच करणार? की चांभाराचे काम पण तुम्हीच करणार? आत्ता हे सगळे तुमच्या सोबत आहेत, म्हणून तुम्हाला त्यांच्यात खोट दिसते आहे. जेव्हा ते तुमच्या पासून दूर निघून जातील, तेव्हा रडत बसाल. तुमच्या पासून दूर झाले की ते तुमचे शत्रू बनतील. निव्वळ आपल्या अज्ञानामुळे, आपल्या श्रेष्ठत्वाच्या खोट्या अभिमानामुळे तुम्ही तुमच्या समाजाचा एवढा मोठा हिस्सा दूर लोटत आहात. विचार कर, सात करोड लोकांची शक्ती आणि आधार किती असतो? जर तुम्ही त्यांना प्रेम आणि आदराने वागवले तर ते तुमच्या घामाच्या बदल्यात आपले रक्त सांडायला ही तयार होतील. इतक्या मोठ्या शक्तीला दूर लोटून तुम्ही किती निर्बल व्हाल! पंडित, एक गोष्ट अजुन सांग बरं मला, तोच दमरू जो ख्रिश्चन झाला, तुमच्या बरोबरीने येऊन बसला तर तुम्ही त्याचा तिरस्कार कराल की नाही?

मी उत्तर दिले - मी का त्याचा तिरस्कार करेन? ख्रिश्चनांचा कुणी तिरस्कार नाही करत.

साहेब हसून म्हणाले - कमाल आहे बुवा तुमच्या बुद्धीची! आधी त्यांचा तिरस्कार करत होता, नाही? कारण तेव्हा ते हिंदू होते आणि तुमच्या देवापुढे नतमस्तक होत होते. आणि आता तुम्ही त्यांचा तिरस्कार नाही करणार कारण आता ते हिंदू नाहीत, आता ते तुमच्या देवाला मानत नाहीत.

रामभक्ताच्या स्पर्शाने तुमचा धर्म डळमळतो आणि रामाचा विरोध करणाऱ्याचे पाय धरले तरी तुमचा धर्म पवित्र आणि अटळ राहतो. काय मूर्खपणा आहे हा! ओह! तुम्ही लोक डोळे असून आंधळे आहात. पंडित, महान येशूच्या शीतल छायेत दमरू वाढला, त्याची छान प्रगती झाली. आणि आज तोच थॉमस नाव धारण करून तहसीलदार बनून तुझा मालक बनला आहे. ज्या दमरूला नुसते पाहून सुद्धा तुझ्या हिंदू समाजाचे रक्त गोठत असे, आज त्याच दमरूपुढे मोठ-मोठे धर्म-रक्षक हात जोडून उभे राहतात. त्यांच्यातलाच तू ही एक आहेस. बोल, करशील आता अस्पृश्यांचा तिरस्कार?

हे ऐकून मी सुन्न झालो. आधी तर मला वाटले साहेब मस्करी करत आहेत की काय! पण लवकरच मला सगळं समजलं. माझ्या डोळ्यासमोरचा पडदा दूर झाला. आज मला समजले की आम्ही अस्पृश्यांचा तिरस्कार का करतो! तिथल्या तिथे साहेबांसमोर मी शपथ घेतली - अस्पृश्य माझे भाईबंद आहेत. मी कधीही त्यांचा तिरस्कार करणार नाही. त्यांच्यावर प्रेम करेन, त्यांच्या सुख-दु:खात सामील होणे मी माझे कर्तव्य समजेन. इतकेच नाही तर माझ्या इतर बांधवांना सुद्धा अशाच प्रकारे कर्तव्य पालन करायला लावेन.

**अंत**